**टंचाई कालावधीत ग्रामीण भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ प्रत्यक्षात पूर्ण झालेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत.**
**(लेखाशिर्ष २२१५ A१९५)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०२३/प्र.क्र. ७०/पापु-१४**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २७ मार्च, २०२४

**वाचा :-**

(१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु-१४, दिनांक ३ फेब्रुवारी, १९९९.
(२) शासन परिपत्रक, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र. १९१/पापु-१४, दिनांक २७ नोव्हेंबर, २०१८
(३) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्रमांक: २०२३/मशाका/नै. आ./पाटं/ कावि-१२४८, दिनांक १२ सप्टेंबर, २०२३
(४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांचे पत्र क्रमांक . क्र. जिपपु/ग्रापापु/टंचाई/ २८४/२३, दिनांक ०१ सप्टेंबर, २०२३ व पत्र क्रमांक : जिपपु/ग्रापापु/टंचाई/१०/२४, दिनांक ०५ जानेवारी, २०२४
(५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा यांचे पत्र क्रमांक . क्र. ग्रापापु/हि-६/१२६७ २०२३, दिनांक २७ सप्टेंबर, २०२३ व पत्र क्रमांक : ग्रापापु/हि-६/१२७९/२०२३, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०२३
(६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली यांचे पत्र क्रमांक . क्र. जिपसां/ग्रापापु/ आस्था-३/ वशी/५१९९/२०२३, दिनांक ०६ ऑक्टोबर, २०२३
(७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांचे पत्र क्रमांक . क्र. जिपसो/ग्रापापु/ लेखा-३/४२०/२०२३, दिनांक २९ मे, २०२३

**प्रस्तावना** :-

राज्यातील ग्रामीण भागातील पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील खर्च (२२१५ ए १९५) या लेखाशीर्षाखाली या विभागाकडून उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात येतो. **सन २०२२-२३ या** टंचाई कालावधीत प्रत्यक्षात पूर्ण केलेल्या **उपाययोजनांसाठी**, विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभागातील जालना, बीड व नांदेड आणि पुणे विभागातील पुणे, सातारा, सांगली व सोलापूर या जिल्हयांचा निधी मागणीचा प्रस्ताव विभागास प्राप्त झाला आहे. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात, लेखाशीर्ष (२२१५ ए १९५) ३१, सहायक अनुदाने (योजनेत्तर) या उद्दीष्टांतर्गत अर्थसंकल्पीय केलेला

निधी विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर यांनी मागणी केलेल्या व प्रत्यक्षात पूर्ण झालेल्या उपाययोजनांसाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

ग्रामीण भागात पेयजल टंचाई निवारणार्थ शासनाने विहीत केलेल्या निकषानुसार विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर व पुणे यांना त्यांच्या विभागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ उपाययोजनांवरील प्रत्यक्षात पूर्ण झालेल्या उपाययोजनांचा खर्च भागविण्यासाठी (**लेखाशिर्ष २२१५ ए १९५**) **अंतर्गत एकूण रु. १३३५.०७ लक्ष (अक्षरी रुपये तेरा कोटी पस्तीस लाख सात हजार फक्त)** इतका निधी खालील अटींच्या अधीन राहून खालीलप्रमाणे वितरीत करण्यास मान्यता देत आहे :-

**( रुपये लाखात)**

| **अ.क्र** | **विभाग** | **जिल्हा** | **वितरीत करावयाचा निधी** |
|---|---|---|---|
| १ | पुणे | पुणे | १००.०० |
| | | सातारा | २००.०० |
| | | सांगली | ५९.०७ |
| | | सोलापूर | ५००.०० |
| २ | छत्रपती संभाजीनगर | जालना | ८२.०० |
| | | नांदेड | ३००.०० |
| | | बीड | ९४.०० |
| **एकूण** | | | १३३५.०७ |

उपरोक्त प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या निधीसंदर्भात संबंधित यंत्रणांनी पाणी टंचाई योजनेअंतर्गत राबविण्यात आलेल्या उपाययोजनांवर झालेल्या खर्चाच्या देयकांच्या प्रती खास दुतामार्फत दि. १५ एप्रिल, **२०२४** रोजी पर्यंत शासनास सादर कराव्यात. सदर देयकांच्या प्रती विहीत कालावधीत प्राप्त न झाल्यास अनियमितता समजण्यात येईल याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित अधिकारी/कर्मचारी यांची राहील, याची कृपया नोंद घेण्यात यावी.

**अटी व शर्ती**

१) विभागीय आयुक्त, **पुणे व छत्रपती संभाजीनगर** यांनी सदर निधी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना थेट वितरीत करावा.

२) **सन २०२२-२३** या टंचाई कालावधीमध्ये ग्रामीण भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांच्या प्रलंबित देयकांच्या प्रदानासाठी सदर निधी वितरीत करण्यात यावा.

३) विभागीय आयुक्त यांनी सदर निधी प्राधान्याने टँकरने पाणी पुरवठा करणे, विहिर अधिग्रहण, या उपाययोजनांना वितरीत करावा.

४) सदर निधी स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account ) अथवा बँक खात्यात न ठेवता तो कंत्राटदारांना थेट Electronic Clearing Services/RTGS द्वारे वितरीत केला जाईल याची दक्षता घ्यावी.

५) निधीचे वितरण करतांना यापूर्वी संबधित उपाययोजनांना निधी वितरित करण्यात आलेला नाही याची खातरजमा करावी.

६) यापुढे टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या उपाययोजनांकरिता निधीची मागणी करतांना, टंचाई निवारणार्थ कोणत्या प्रस्तावित उपाययोजना कोणत्या कालावधीसाठी घ्यावयाच्या आहेत, त्यासाठी किती निधीची आवश्यकता आहे याबाबत बाब निहाय/ उपाययोजनानिहाय मागणी तसेच चालू आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादी बाबतची माहिती, तसेच त्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावीत. त्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार याची नोंद घेण्यात यावी.

७) ज्या ग्रामीण उपाययोजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्यात येत आहेत, त्या उपाययोजनांसाठीचा निधी मागणी नुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिला जातो. यास्तव जिल्हा परिषद अथवा जिल्हाधिकारी यांच्या मार्फत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला निधी वितरीत करण्यात येऊ नये.

८) **सदर शासन निर्णयानुसार टँकरद्वारे/पिण्याच्या पाणी पुरवठा करण्यासाठीच्या उपाययोजनांकरीता जो निधी वितरीत करण्यात आला आहे, त्यामधून देयके अदा करताना खाजगी टँकरवर जी.पी.एस. प्रणाली बसविलेली असेल व जी.पी.एस.प्रणालीवर ज्या टँकरच्या फे-यांची नोंद होईल त्याच फेऱ्या देयकाकरिता अनुज्ञेय राहतील. पाणी पुरवठा करणा-या ज्या टँकरवर जी.पी.एस.प्रणाली बसविलेली नाही किंवा जी.पी.एस.प्रणाली बंद असल्याकारणाने टँकर वाहतूक धारकाने टँकरच्या फे-या झाल्याचा दावा केला असल्यास, अशा फे-या अनुज्ञेय ठरणार नाहीत. तसेच जी.पी.एस. प्रणालीची नोंद होत नाही अशी देयके प्रमाणित करण्यात येऊ नये व अशा प्रकारे प्रमाणित केलेल्या देयकांसाठी निधी वितरीत करण्यात येऊ नये.**

९) **या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी टंचाई कालावधी सन २०२२-२३ करिता वितरीत करण्यात येत असल्याने व प्रत्यक्षात पूर्ण झालेल्या उपाययोजनांसाठी असल्याने सदर निधी दिनांक ३१ मार्च, २०२४ पर्यंत खर्ची टाकण्यात यावा. सदर निधी त्वरित संबंधित कार्यालयांना /जिल्हा परिषद /जिल्हाधिकारी यांना वितरीत करावा. सदर निधी विहित कालावधीत**

**खर्ची न झाल्यास त्याबाबतची आर्थिक अनियमितता समजण्यात येईल. या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र, दिनांक १५ एप्रिल, २०२४ पूर्वी शासनास सादर करावे.**

१०) **नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ उपलब्ध करण्यात आलेल्या तरतूदीतून मागील वर्षात घेण्यात आलेल्या विविध योजना / पाणी पुरवठा विषयक कामे पूर्ण करण्यात आली असल्याचे जिल्हाधिकारी/ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद / सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी खात्री करावी.**

११) **पाणी जीवनावश्यक / अत्यावश्यक बाब असल्याने, त्या आडून गैरप्रकार होणार नाहीत, त्याच त्याच योजना पुन्हा- पुन्हा दरवर्षी घेण्यात येत नाहीत व त्यावर अनावश्यक खर्च करण्यात येत नाही, याची खात्री संबंधित विभागीय आयुक्त/ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद /सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी करावी.**

१२) ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे, त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती विभागीय आयुक्तांनी शासनाकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपद्धतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणा-या प्रत्यक्ष खर्चाची माहिती पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या शासनास सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे त्रैमासिक पडताळणी विहीत प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी / मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तसेच सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी घ्यावी. **वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहीत वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी**. आवश्यक तेवढयाच निधीची मागणी करावी. अधिक निधीबाबतची मागणी करण्यात येवू नये.

**१३)** क्षेत्रीय कार्यालयांच्या प्राप्त मागणी नुसार सदर निधी वितरीत करण्यात येत असला तरी, टंचाई कालावधी **२०२२-२३** करिता आवश्यक तेवढाच निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे आहरित करावा. अतिरिक्त निधी आहरित केल्यास व अखर्चित राहिल्यास त्याबाबत संबंधितांविरुद्ध शिस्तभंगच्या कार्यवाहीकरिता सक्षम प्राधिकाऱ्यांना प्रस्ताव सादर करावा. या कार्यवाहीबाबत पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास अवगत करावे.

**१४)** सदर वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या विनियोगाबाबत उपाययोजनानिहाय, टंचाई कालावधीनिहाय माहिती उपलब्ध करुन द्यावी.

**१५)** याबाबतचा निधी शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे वितरीत करण्यात यावा.

**१६) सदरचा खर्च लेखाशीर्ष "मागणी क्र. वाय-२, मुख्य लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १९६ जिल्हा परिषद पंचायत / संस्थांना सहाय्य, ०२ जिल्हा परिषदांना अनुदान, (०२)(०३) आकस्मिक पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या तात्पुरत्या**

**उपाययोजनांसाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ए १९५)" या लेखाशीर्षांखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीतून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

१७) आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार / उप कोषागार अधिकारी यांच्याकडे पाठविण्यात येणा-या व देयकासोबत जोडल्या जाणा-या संगणक स्लीपमध्ये गौण / उपलेखाशीर्षाचा संगणक संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच, कोषागारातून/ उपकोषागारातून आहरीत केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपाचारिक संदर्भ क्र. १७४ **/व्यय-३, दिनांक १४ मार्च, २०२४** अन्वये प्राप्त मान्यतेनुसारं निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३२६२११४२५७१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUGANDHA DEEPAK PAWAR

Digitally signed by SUGANDHA DEEPAK PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=d4ecddac21f58159928daa9563eab597448bd1556ca3f9caa9101e05e9a13341, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=87D94472B912CB3702FBA035D0A51948B4F9C9AE9051C2DEE02FFCA4B1014CEA, cn=SUGANDHA DEEPAK PAWAR
Date: 2024.03.27 14:11:50 +05'30'

**(सुगंधा पवार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

(१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
(२) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
(३) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
(४) प्रधान सचिव, महसूल ( मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय, मुंबई
(५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
(६) महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
(७) महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
(८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
(९) विभागीय आयुक्त (पुणे व छत्रपती संभाजीनगर विभाग)
(१०) जिल्हा कोषागार अधिकारी, (पुणे व छत्रपती संभाजीनगर विभाग)
(११) जिल्हाधिकारी (पुणे व छत्रपती संभाजीनगर विभाग)
(१२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (पुणे व छत्रपती संभाजीनगर विभाग)
(१३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (पुणे व छत्रपती संभाजीनगर विभाग)

(१४) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
(१५) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
(१६) निवड नस्ती (पापु-१४)